इंदिरा गांधी राष्ट्रीय विकलांग निवृत्तीवेतन योजना सन २०१७-१८ या आर्थिक वर्षा करिता अनुदानाचे वितरण.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : इंगांअ- २०१८ /प्र.क्र.८४१ /विसयो-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १५ जून, २०१७

वाचा :-

१) शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र.मकोनी-१०१०/प्र.क्र.३२/कोषा-प्र.५, दिनांक १५ एप्रिल, २०१०.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थस-२०१७- प्र.क्र -७५ अर्थ-३, दिनांक १८ एप्रिल, २०१७.

**शासन निर्णय :-**

सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत इंदिरा गांधी राष्ट्रीय विकलांग निवृत्तीवेतन योजनेच्या अंमलबजावणीसाठी रु.९,०८,४०,०००/- एवढी अर्थसंकल्पिय तरतूद मंजूर झालेली आहे. संदर्भ क्र.२ येथील परिपत्रकास अनुसरुन व वित्त विभागाच्या मंजुरीस अनुसरुन रु.४,१५,२४,०००/- (रु. चार कोटी पंधरा लक्ष चोवीस हजार फक्त ) एवढी तरतूद या योजनेसाठी माहे जून २०१७ ते सप्टेंबर,२०१७ या कालावधीच्या खर्चासाठी या शासन निर्णयाद्वारे सोबतच्या विवरणपत्राप्रमाणे वितरीत करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. सर्व जिल्हाधिकारी यांना कळविण्यात येते की, त्यांनी यासोबत जोडलेल्या विवरणपत्राद्वारे वितरीत केलेल्या अनुदानाचे वाटप त्यांच्या जिल्हयातील तालुक्यांना आवश्यकतेनुसार करावे. सदरचे अनुदान वितरण जिल्हाधिकाऱ्यांनी कळविलेल्या लाभार्थ्यांच्या संख्येनुसार करण्यात आले आहे. तसेच संदर्भ क्र.१ येथील परिपत्रकानुसार उणे पध्दतीने प्राधिकारपत्र काढण्यास मुभा आहे.

३. सदरहू निधीमधून झालेला खर्च "मागणी क्र.एन-३ मुख्य लेखाशीर्ष २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२-समाजकल्याण, १०४-वृध्द विकलांग व निराश्रीत व्यक्तींचे कल्याण (०८) (१२) इंदिरा गांधी राष्ट्रीय विकलांग निवृत्तीवेतन योजना (केंद्र पुरस्कृत योजना) (२२३५ बी ०४९) ५० इतर खर्च " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

४. सर्व जिल्हाधिकाऱ्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी हा खर्च कोणत्याही परिस्थितीत त्यांच्याकडे सुपूर्द करण्यात आलेल्या अनुदानापेक्षा जास्त होणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी.

५. सर्व जिल्हाधिकाऱ्यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी त्यांच्याकडे सुपूर्द करण्यात आलेल्या अनुदानातून केलेल्या खर्चाचा महालेखापालांच्या कार्यालयात नोंदविलेल्या खर्चाशी ताळमेळ घालून त्याप्रमाणे ताळमेळाचे विवरणपत्राची प्रत या विभागाच्या नियोजन कार्यासनास व या कार्यासनास पाठवावी. तसेच उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापालांच्या कार्यालयास त्वरित पाठवावीत व त्याची प्रत या विभागाच्या नियोजन कार्यासनास व या कार्यासनास (सहाय्यक संचालक, लेखापरीक्षण) पाठवावी. खर्चाच्या ताळमेळाचे काम व्यवस्थितरित्या पार न पाडल्यास, तसेच उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापालांच्या कार्यालयास विहित वेळेत सादर न केल्यास, त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित जिल्हाधिकाऱ्यांवर राहील.

६. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२५२/२०१७/व्यय-१५, दि.२३/५/२०१७ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०१७०६१५१६४०५३८३२२असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Shankar Kamble

Digitally signed by Ashok Shankar Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a46cabe5c0508ff162796cef6812e5a0871884ca74589e042544f55b57006300, cn=Ashok Shankar Kamble
Date: 2017.06.15 16:39:37 +05'30'

**( अशोक कांबळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सर्व विभागीय आयुक्त, पुणे, कोकण, नाशिक, नागपूर, औरंगाबाद व अमरावती.
२) सर्व जिल्हाधिकारी.
३) संचालक ,लेखा व कोषागारे, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, महाराष्ट्र राज्य ,मुंबई
४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई (२ प्रती)
५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
६) महालेखापाल, महाराष्ट्र १/२, (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता(, मुंबई / नागपूर.)
७) वित्त विभाग, अर्थसंकल्प ३ ,४, ५ अर्थोपाय व व्यय १४, मंत्रालय, मुंबई
८) उप सचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) सहाय्यक संचालक(वित्त व लेखा), लेखापरिक्षण कक्ष, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) कक्ष अधिकारी (विसयो-२), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवड नस्ती, विसयो १.